**मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र. ३४४५/२०११ (महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., विरुध्द राज्य शासन व इतर) मध्ये दि.१०.०५.२०१९ अन्वये दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई यांना थकहमी पोटी उर्वरित रु. ३९९.४१ कोटी इतकी रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. ससाका २०१६/प्र.क्र.१७५/३-स,**
मंत्रालय, सहावा मजला, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२.

वाचा:

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.ससाका २०१६/प्र.क्र.१७५/३-स, दिनांक ०४.०५.२०१८.
२) मा. क्लेम कमिटीचा दिनांक २९.०१.२०१९ रोजीचा अहवाल.
३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.ससाका २०१६/प्र.क्र.१७५/३-स, दिनांक ३०.०३.२०१९.
४) मा.सर्वोच्च न्यायालयाचे सिव्हील अपील क्रमांक ३४४५/२०११ मधील आदेश दिनांक २७.०३.२०१९ व दिनांक १०.०५.२०१९.
५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. लेखानु-२०१९/ प्र.क्र. (१२/२०१९)/१७-स, दिनांक १०.०७.२०१९.
६) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.ससाका २०१६/प्र.क्र.१७५/३-स, दिनांक २५.०७.२०१९.
७) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.ससाका २०१६/प्र.क्र.१७५ (भाग -४)/३-स, दिनांक १२.१२.२०१९.
८) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. पुरक-१९२१/ प्र.क्र. ३३/२०२१/ १७-स, दिनांक २०.०७.२०२१.
९) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र.ससाका २०१६/प्र.क्र.१७५/३-स, दिनांक ०५.०८.२०२१.
१०) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : पुरक-२०२१/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि. ०१.११.२०२१
११) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक : पुरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थसंकल्प-३, दि. ०३.०१.२०२२.
१२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. पुरक १९२१/ प्र.क्र. ११६/२०२१/ १७-स, दिनांक ०४.०१.२०२२.

प्रस्तावना:-

सहकारी साखर कारखाने, सहकारी सुतगिरण्या व कृषी प्रक्रिया सहकारी संस्थांना महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने सन १९९३ पासून विविध प्रकारची कर्जे दिली आहेत. सदर कर्जाना राज्य शासनाने वेळोवेळी हमी दिली होती. कर्जदार संस्था बँकेची परतफेड करू शकल्या नाहीत. त्यामुळे महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई यांना वेळोवेळी थकहमी आवाहनीत केली होती. याबाबत मा. उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई यांनी मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे सिव्हील अपील क्रमांक ३४४५/२०११ दाखल केले होते. सदर अपीलामध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १०.०५.२०१९ अन्वये दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई यांना शासन निर्णय दिनांक २५.०७.२०१९, दिनांक १२.१२.२०१९ व दिनांक ०५.०८.२०२१ अन्वये रु.५५० कोटी इतकी रक्कम अदा करण्यात आली आहे. आता मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्रमांक ३४४५/२०११ मध्ये दिनांक १०.०५.२०१९ अन्वये

दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई यांना थकहमीपोटी दयावयाची उर्वरित रक्कम रूपये ३९९.४१ कोटी (रुपये तिनशे नव्व्याण्णव कोटी ऐक्केचाळीस लाख फक्त) अदा करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मा. सर्वोच्च न्यायालयात थकहमीची रक्कम मिळणेबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने महाराष्ट्र शासनाविरूध्द दाखल केलेल्या सिव्हील अपिल क्र.३४४५/२०११ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांनी दि.१०.०५.२०१९ रोजी दिलेल्या आदेशानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई यांना दयावयाच्या रकमेपैकी उर्वरित रु. ३९९,४१,००,०००/- (रुपये तिनशे नव्व्याण्णव कोटी ऐक्केचाळीस लाख फक्त) इतकी रक्कम खालील अटींच्या अधीन राहून मंजूर व वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

१) मा. उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली सदर प्रकरणी दि. ९.९.२०२० रोजी आयोजित करण्यात आलेल्या बैठकीत, महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस थकहमीच्या प्रकरणामध्ये देय असलेली व्याजाची रक्कम cost of fund विचारात घेऊन निश्चित करण्यात यावी, असे निर्देश दिले आहेत. यासंदर्भात साखर आयुक्त यांनी cost of fund निश्चित करण्यासाठी साखर आयुक्त, पुणे यांनी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून आवश्यक माहिती प्राप्त करुन घेऊन सदर तपशील सहकार विभाग/ वित्त विभागास सादर करावा. तसेच, उपरोक्त रु. १०४९.४१ कोटी रकमेपैकी रु. ५४९.२४ कोटी दंडव्याज/penalty दर्शविण्यात आली असून, त्याबाबतची माहिती साखर आयुक्त, पुणे यांचेकडून सादर करण्यात येईल.

२) यापूर्वी शासन निर्णय दिनांक ४.५.२०१८ अन्वये रु. ७४ कोटी इतकी रक्कम आकस्मिकता निधीतून महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस अदा करण्यात आली होती. यासंदर्भात हमी आवाहनित पोटी रकमा बँकेस अदा केल्यानंतर बँकेने त्यांच्याकडे कारखान्यांचे तारण ठेवलेले Personal Bonds /Surety इ. सर्व तारण मालमत्तेतून प्राप्त होणारी रक्कम शासनास अदा करण्यात येईल.

३) हमी देतांना काही प्रकरणांमध्ये मा. मंत्रिमंडळाची मान्यता घेतलेली नसल्याने, झालेल्या अनियमिततेच्या अनुषंगाने संबंधितांवर जबाबदारी निश्चित करुन वसूली करण्यात येईल.

४) सदर प्रकरणी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय दिनांक ४.५.२०१८ अन्वये रु. ७४ कोटी मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार महाराष्ट्र राज्य सहकार बँकेला आकस्मिकता निधीतून अदा केली असून, सदर रक्कम देण्यात येणाऱ्या रकमेतून वळती करुन घेण्यात आली किंवा कसे याबाबत खात्री करण्यात यावी.

२. मा. क्लेम्स समितीने दिलेल्या अहवालातील ( WCTL) J (11), J (9 ), LT LOAN A (i), LT LOAN A (ii), LT LOAN A (iii), MT GAP LOAN (J5), MT LOAN (J8) WCTL LOAN (J 10), WCTL LOAN (J 13) कर्ज खात्याच्या मुद्दलाला वर्ग करण्याबाबत शासन निर्णय दि. ३०.०३.२०१९ दि. २५.०७.२०१९, दिनांक १२.१२.२०१९ व दिनांक ०५.०८.२०२१ अन्वये मान्यता देण्यात आली होती. यास्तव सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रु. ३९९,४१,००,०००/- (रुपये तिनशे नव्व्याण्णव कोटी ऐक्केचाळीस लाख फक्त) एवढी रक्कम क्लेम कमिटीने अहवालात नमूद केलेल्या उर्वरीत कर्ज खात्यात वर्ग करावी.

३. वरील अटींप्रमाणे महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने रक्कमा वर्ग केल्यानंतर त्याचा तपशिल साखर आयुक्तांमार्फत राज्य शासनास विनाविलंब सादर करावा.

४. सदर निधी **“मागणी क्रमांक व्ही-२, २४२५ सहकार, ००, ००१ संचालन व प्रशासन, (०१)(०८) साखर आयुक्तालयाचे बळकटीकरण (अनिवार्य) (२४२५१०५४) १३, कार्यालयीन खर्च”** या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधून अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम रु. ३९९,४१,००,०००/- (रुपये तिनशे नव्याण्णव कोटी ऐक्केचाळीस लाख फक्त) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई यांना अदा करण्यासाठी प्रस्तुत प्रकरणी “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना व “नियंत्रण अधिकारी” (V०००२) म्हणून साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, महाराष्टर् राज्य, पुणे यांना घोषित करण्यात येत आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी रक्कम आहरित करुन संबंधितांना अदा करण्याची कार्यवाही करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक: पुरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थसंकल्प-३, दि. ०३.०१.२०२२ नुसार व वित्त विभागाचा अनौसं क्रमांक ५९/२२/व्यय-२, दिनांक ०१.०२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०२०२१७३६५८३००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa29ab2a9a96d3a62a7a97531711f1ef9f3e78de039be6cabb44929032069507, serialNumber=c9fc0e76e90819f7f6d29d043a3e393d7982322683a082d04eda26b7264e4837, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2022.02.02 17:38:01 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल महोदय यांचे खाजगी सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई (सर्व).
५. मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई (सर्व).
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (मुळ स्वाक्षरीच्या १० प्रतींसह)
११. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४. अध्यक्ष/कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि., मुंबई.
१५. सहसचिव / उपसचिव, वित्त विभाग (व्यय-२/ अर्थसंकल्प-१३/अर्थबळ/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
१६. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७ स, २४ स, २ स व २५ स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. निवडनस्ती ३-स.